“नवीन चंद्रपूर शहराचा विकास” या योजनेकरिता वित्तीय वर्ष २०२३-२४ करिता आर्थिक तरतुदींचे वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र: नविच-२०२३/प्र.क्र.५३/गृनिधो-१**

नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ जुलै, २०२३.

**वाचा** :- १) मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर यांचे जा.क्र. मुअ/नाम/एसपीए/४७२२/२०२३, दि.०३.०७.२०२३ रोजीचे पत्र.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना** :

चंद्रपूर जिल्ह्यातील १३९१.७१ हेक्टर इतक्या क्षेत्रावर नवीन चंद्रपूर शहर बसविण्याचा शासनाने सन १९९८ मध्ये निर्णय घेतला आहे. नवीन चंद्रपूर येथील अधिसूचित विभागातील विकासाची कामे करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) ची विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्ती करण्यात आलेली असून सदर प्राधिकरणाच्या नागपूर मंडळाकडून या योजनेची कामे कार्यान्वित करण्यात येत आहेत. या योजनेच्या विकास आराखड्यास शासन अधिसूचना, नगर विकास विभाग, दि.३० जून, १९९८ अन्वये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. म्हाडाकडून राबविण्यात येत असलेल्या सदर योजनेत नवीन चंद्रपूर वसाहत येथे विद्युत पुरवठा, पाणी पुरवठा, मुख्य रस्त्यांची कामे, भूसंपादनाची कामे व इरई नदीवरील पुलाचे काम इत्यादी कामांचा अंतर्भाव आहे. सदर योजना ही दिर्घपल्ल्याची योजना असून निधीच्या उपलब्धतेनुसार राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गतच्या विविध कामांना म्हाडाकडून वेळोवेळी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. त्याअनुषंगाने मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर यांनी या योजनतील विकास कामांकरीता संदर्भ क्र.१ येथील दि.०३.०७.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने म्हाडा प्राधिकरणास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नवीन चंद्रपूर शहर विकास योजने अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखाशिर्ष क्रमांक २२१६, गृहनिर्माण (०३) (०६) नवीन चंद्रपूर शहराचा विकास, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१६ ११०२) या लेखा शीर्षाअंतर्गत रु.४५.२५ कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आली आहे. त्यानुसार लेखा शीर्षाखाली मंजूर असलेल्या एकूण

रु.६५.०० कोटी अर्थसंकल्पीय अनुदानाच्या २०% मर्यादेत एकूण रु.९,५०,००,०००/- इतक्या निधीपैकी **रु.७,१३,२५,४८५/- इतका निधी खालील** नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहून, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास यान्वये मंजूर करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | कामाचे विवरण | मागणी केलेला निधी | उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | आस्थापना खर्च (अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार). | रु.७०,००,०००/- | रु.७०,००,०००/- |
| २. | भूसंपादीत केलेल्या कुंपणाकरीता लागणारा निधी. | रु.८०,००,०००/- | रु.७०,५०,०००/- |
| ३. | विशेष नियोजन प्राधिकरण अंतर्गत झालेल्या कामाचे आकस्मिक देखभाल व दुरुस्ती खर्च (अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार) | रु.७०,००,०००/- | रु.७०,००,०००/- |
| ४. | मलनि:सारण च्या कामातील भाववाढीच्या देयकाकरिता लागणारा निधी (Including GST) | रु.५,०२,७५,४८५/- | रु.५,०२,७५,४८५/- |
| | एकूण :- | रु.७,२२,७५,४८५/- | रु.७,१३,२५,४८५/- |

**अटी व शर्ती :**

१) अनुदान ज्या प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरिता त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे.

२) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने सदर निधीतून होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३) सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा.

४) प्रस्तुत प्रकरणी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील.

**२.** या बाबींवर होणारा खर्च मागणी क्रमांक क्यू-३, मुख्य लेखा शिर्ष "२२१६, गृहनिर्माण - ८०, सर्वसाधारण- १०३, गृहनिर्माण मंडळे, इत्यादींना सहाय्य, (०३) आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांना घरकुलासाठी अर्थसहाय्य - (०३) (०६) चंद्रपूर शहराच्या नवीन वसाहतीचा विकास (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१६ ११०२) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**३.** हे आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०७१३१४५००२६००९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL VITTHAL UKIRADE

Digitally signed by SUNIL VITTHAL UKIRADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f1675ab906bc1ceaccfbc91a08ebb1af88bab8226074b0ac8613e6304e94f278, pseudonym=14331574F32E5B1EABF043BD58C8BB9583792511, serialNumber=902164C64C3FBA37F940B9E5A180D28DD1440382E63E7302A5E29F41123A9B06, cn=SUNIL VITTHAL UKIRADE
Date: 2023.07.13 14:51:51 +05'30'

**( सुनिल उकिरडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकारण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई,
४) मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, नागपूर,
५) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकारण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) उप सचिव (श्री.कवडे), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (गृनिधो-१/रोख शाखा/अर्थ व लेखा), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कक्ष अधिकारी (अर्थ व लेखा), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (गृनिधो-१).